**शासकीय कर्मचारी व अधिकारी यांच्यासाठी विहित केलेल्या हिंदी भाषा परीक्षांसाठी नियुक्त केलेल्या एतदर्थ मंडळाची पुनर्रचना**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हिंभाप-२०१५/प्र.क्र.१४०/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ७ मार्च २०१७

वाचा:- शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.हिंभाप-१०८८/१२७/प्र.१२/८८/वीस, दि.२९.२.१९८८

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभागामार्फत हिंदी भाषा परीक्षा एतदर्थ मंडळाची दीर्घ मुदतीसाठी पुनर्रचना दि.२९.२.१९८८ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. सदर काम आता मराठी भाषा विभागामार्फत हाताळण्यात येत असल्याने शासकीय अधिकारी व कर्मचारी यांचेसाठी विहित केलेल्या हिंदी भाषा परीक्षांसाठीच्या एतदर्थ मंडळाची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

शासकीय अधिकारी व कर्मचारी यांचेसाठी विहित केलेल्या हिंदी भाषा परीक्षा घेणे व त्या परीक्षांचे निकाल लावणे यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या एतदर्थ मंडळाची पुनर्रचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

**हिंदी भाषा परीक्षा - एतदर्थ मंडळ**

| | | |
|---|---|---|
| १) प्रधान सचिव/सचिव, मराठी भाषा विभाग | - | अध्यक्ष |
| २) उप सचिव, मराठी भाषा विभाग | - | सदस्य |
| ३) विभागीय सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, वाशी, नवी मुंबई | - | सदस्य |
| ४) प्रा.श्रीमती वंदना प्रल्हाद पावसकर, विलेपार्ले, मुंबई | - | अशासकीय सदस्य |
| ५) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई | - | सदस्य सचिव |

हिंदी भाषा परीक्षांसाठी विहित केलेल्या अभ्यासक्रमात आवश्यकतेनुसार बदल करण्यासंदर्भात व परीक्षा संदर्भातील अन्य प्रश्नांबाबत हे मंडळ शासनाला सल्ला देईल. सदर मंडळावरील अशासकीय सदस्यांची मुदत तीन वर्षासाठी अथवा यासंदर्भात शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत करण्यात येत आहे.

सदर मंडळावर कार्यरत असणाऱ्या शासकीय /अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित आदेशानुसार प्रवास भत्ता, दैनिक भत्ता तसेच बैठक भत्ता अनुज्ञेय राहील. याबाबतचा खर्च भाषा संचालनालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०८१५५११११४७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Leena Vivek Dhuru

Digitally signed by Leena Vivek Dhuru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Bhasha, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=269247ae44c2ad89fc0cbab5ac68fe64bca5544d860f22f8bb39204bee1090c6, cn=Leena Vivek Dhuru
Date: 2017.03.08 16:01:41 +05'30'

**( लिना वि. धुरू )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
४. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, (पत्राने)
५. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधान भवन, मुंबई
८. लोक आयुक्त, लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३.सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, मुंबई
१४.भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५.मा. मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी
१६.सर्व मंत्रालयीन विभाग
१७.एतदर्थ मंडळाचे सर्व सदस्य (भाषा संचालक यांच्यामार्फत)
१८. निवडनस्ती (भाषा-२)